**नाशिक जिल्हयातील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान आयडीबीआय बँकेमार्फत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. वेतन १२१४/प्र.क्र. ५९/१४/टीएनटी-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १४ जून, २०१७

**संदर्भ** :- १) शालेय शिक्षण शासन निर्णय क्र. एसएसएन -१८६७/७६१४२-जी, दिनांक २९ मे १९७३
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. डी.डी.ओ.-१००५/प्र.क्र.५/कोषा-प्रशा-५, दिनांक २९ ऑगस्ट, २००५
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.डी.डी.ओ. १००५/प्र.क्र.६२/कोषा-प्रशा-५, दिनांक ७ एप्रिल, २००८
४) शासन निर्णय , शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/१२/माशि-२, दिनांक ३ ऑगस्ट, २०१२
५) शासन शुध्दीपत्रक , शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/०७/माशि-२, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/०७/माशि-२, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२

**प्रस्तावना :-**

राज्यातील मान्यताप्राप्त अनुदानित - विना अनुदानित खाजगी प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान सहकारी बँकेमार्फत करणेबाबत संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आली होती. सद्यस्थितीत काही राष्ट्रीयकृत व खाजगी बँका कोणत्याही प्रकारचे सेवा शुल्क न घेता, वेतन व भत्ते अदा करण्यास तयार आहेत. त्यामुळे वित्त विभागाने शासनाची आर्थिक बचत होण्यासाठी राष्ट्रीयकृत व खाजगी बँकातून सेवा शुल्काशिवाय वेतन व भत्ते अदा करण्यास आदेशीत केलेले आहे. त्यानुसार शालेय शिक्षण विभागातंर्गत नाशिक जिल्हयातील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांसाठी ही योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावामध्ये नमूद केल्याप्रमाणे वित्त विभागाने संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयानुसार शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी जी विहित कार्यप्रणाली स्विकृत केलेली आहे, त्याच कार्यप्रणालीनुसार नाशिक जिल्हयातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान **नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक या बँकेऐवजी आयडीबीआय या खाजगी बँकेमार्फत** करण्यास शासन

मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठी वित्त विभागाने ज्या अटी व शर्ती लागू केलेल्या आहेत त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. सदर निर्णयाची अंमलबजावणी दिनांक १ जुलै, २०१७ पासून अंमलात येईल. याबाबत काही अडचणी असल्यास त्याबाबत संचालक, लेखा व कोषागारे व विभागीय उपसंचालक, लेखा व कोषागारे यांची मदत घेण्यात यावी.

याबाबत शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), नाशिक यांचे मेन पूल अकाउंट (पार्कींग अकाउंट) आयडीबीआय या बँकेत तात्काळ उघडण्यात यावे.

वरील प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर कार्यपूर्ती अहवाल आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१४१८२४४८२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.06.14 18:26:05 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे खाजगी सचिव
२ आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३ महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५ संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६ सह संचालक (सुधारणा), संचालनालय, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७ शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्य), महाराष्ट्र राज्य, पुणे
८ विभागीय शिक्षण उप संचालक, मुंबई विभाग, मुंबई
९ शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक ), जिल्हा परिषद, नाशिक
१० जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
११ अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक/माध्यमिक), नाशिक
१२ सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३ निवड नस्ती, टीएनटी/३, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.